<u>पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्प</u>
**सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे.पीडब्ल्यूसी कंपनीस माहे नोव्हेंबर,२०१६ ते मार्च,२०१७ या कालावधीकरीता केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी -३६१५ /प्र.क्र.७६ /भाग-१ /पोल-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, २ रा मजला, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : ३१ जुलै, २०१७**

**३<u>वाचा:</u>**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः २१५६/फाईल/डीआयटी/२०१२, दि. २१ सप्टेंबर, २०१२.
२. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय,शासन निर्णय : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.०१/०७/२०१४.
३. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: सीसीटी ३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि. २९/०५/२०१५.
४. माहिती व तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग, शासन निर्णय, क्रमांकः MH-९/१७९/२०१३-DIR-DIT(MH)-DIT (MH), दि. २ नोव्हेंबर, २०१३.
५. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: सीसीटी ३६१५ /प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि. २५/०७/२०१६.
६. मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा. ली. यांची दि. ३१.१२.२०१६, दि.६.२.२०१७ व दि. २९.०३.२०१७ ची देयके.
७. पोलिस आयुक्त पुणे शहर यांचे दि.६.४.२०१७ चे पत्र
८. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: सीसीटी ३६१५ /प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि. ५/६/२०१७.

**<u>प्रस्तावना</u>**

गृह विभाग, शासन निर्णय दि. २९.०५.२०१५ अन्वये पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणुन मे.प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.ली. या कंपनीची नियुक्ती करण्यात आली आहे. तदनंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.०७.२०१६ अन्वये पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. प्राईस वॉटरहाऊस कुपर्स प्रा.ली. या कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागारास दि.३१.१०.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच त्यानंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.५.६.२०१७ अन्वये पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. प्राईस वॉटरहाऊस कुपर्स प्रा.ली. या कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागारास दि.१.११.२०१६ ते दि.३०.०६.२०१७ या आठ महिन्यांच्या कालावाधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार सदर प्रकल्प सल्लागारांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. सदर कंपनीने उपरोक्त प्रकल्पासंदर्भात प्रकल्प सल्लागार म्हणुन दिनांक १ नोव्हेंबर २०१६ ते ३१ मार्च २०१७ या पाच महिन्याच्या कालावधीसाठी पाहिलेल्या कामाची देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. पीड्ब्ल्युसी कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली असून माहिती व तंत्रज्ञान विभाग शासन निर्णय दि.०१.०७.२०१४ अन्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्यानुसार मे.पीड्ब्ल्युसी कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागाराने पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी दिनांक १ नोव्हेंबर २०१६ ते ३१ मार्च २०१७ या पाच महिन्याच्या कालावधीसाठी पाहिलेल्या सल्लागाराच्या कामासाठी देयक म्हणुन (मानधन, सेवा कर व इतर खर्च मिळून) एकूण रु.१२,९६,५५६ /- ( अक्षरी रुपये बारा लाख शहाण्णव हजार पाचशे छप्पन फक्त) इतकी रक्कम मे. पीड्ब्ल्युसी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| Pune CCTV Project (November 2016- March 2017) | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| # | Period & Invoice No. | Resource Name | Designation | Man Month Rate as per GR dated (01-July-2014) | Deployment (Percentage) | Applicable Amount per Resource (INR) | Total Applicable Amount | OPE Claimed | Sub Total (INR) | Service Tax @14 % | Swachh Bharat Cess @ 0.50% | Krishi Kalyan Cess @ 0.50% | Total Amount (INR) |
| A | B | C | D | E | F | G = E x F | H | I | J | K=STx J | L = SBC x J | M=KKC x J | N = J+K+L+M |
| 1 | 1st November 2016 to 31st December 2016 & 416059044 | Pankaj kumar Londhe | Senior Consultant | 2,20,000 | 100% | 2,20,000 | 440000 | 900 | 440,900 | 61,726 | 2,205 | 2,205 | 507,036 |
| 2 | 1st January 2017 to 31st January 2017 & 416068459 | Pankaj kumar Londhe | Senior Consultant | 2,20,000 | 100% | 2,20,000 | 220000 | 11,720 | 231,720 | 32,441 | 1,159 | 1,159 | 266,479 |
| 3 | 1st February 2017 to 31st March 2017 & 416089562 | Pankaj kumar Londhe | Senior Consultant | 2,20,000 | 100% | 2,20,000 | 440000 | 14818 (Feb - 2870 + March- 11948) | 454,818 | 63,675 | 2,274 | 2,274 | 5,23,041 |
| **Total Amount Claimed (INR)** | | | | | | | | **27438** | **11,27,438** | **1,57,842** | **5,638** | **5,638** | **12,96,556** |

**टीप:-**

अ) उपरोक्त देयक या संदर्भात नमुद शासन निर्णय क्र. २ मध्ये नमुद केल्यानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) शासन निर्णय संदर्भ क्र.२ नुसार सल्लागाराने कार्यालयीन कामासाठी केलेला प्रवास, भोजन, निवास, खर्च सल्लागारांना अनुज्ञेय राहील. हा खर्च सल्लागाराच्या महिन्याच्या देयकांच्या एकुण खर्चाच्या ५ % पर्यंत अनुज्ञेय केला आहे.

क) संदर्भ क्र.६ अन्वये मे. पीड्ब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रकमा अदा करण्यात येत आहेत. सदर रकमांमध्ये नोव्हेंबर,२०१६ ते मार्च,२०१७ या पाच महिन्याच्या कालावधीसाठी एकूण १५% कर (१४% सेवा कर +०.५ % स्वच्छ भारत कर+ ०.५ कृषी कल्याण कर ) समाविष्ट करण्यात आला आहे.

ड) सीसीटीव्ही प्रकल्पासाठी संबधित कंपनीला सल्लागाराच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आली आहे असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

इ) सदर देयके आयकर व इतर प्रचलित वजाती करून अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५ - पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशीर्षाखाली टाकून तो सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरचा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७३११२३०१७९०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2017.07.31 12:37:44 +05'30'

**(धी.का.अभंग)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत : माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी.**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. पोलीस आयुक्त,पुणे शहर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे .
१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय, मुंबई.
११. मे. पीडब्ल्युसी प्रा.लि., २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
१२. माहिती व तंत्रज्ञान विभाग, कार्यासन साप्रवि-३९
१३. वित्त विभाग,कार्यासन- व्यय ७
१४. अर्थ शाखा, गृह विभाग.
१५. निवड नस्ती / पोल-३.

******